शासकीय व इतर कार्यालयांमध्ये
वाहनांच्या वापरासंबंधी धोरण
सुधारणा

महाराष्ट्र शासन
वित्त विभाग
शासन शुध्दीपत्रक क्रमांक : वाहन १००२/प्र.क्र. ७५ /२००२/विनियम.
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
दिनांक : १३ मार्च, २००३

वाचा :- (१) शासन निर्णय क्रमांक : वाहन -१०००/प्र.क्र.६५/२००१/विनियम, दिनांक १० सप्टेंबर २००१
(२) शासन शुध्दीपत्रक क्रमांक : वाहन - १००२/प्र.क्र.७५/२००२/विनियम, दि.१२ सप्टेंबर, २००२

**शासन निर्णय**

दिनांक १० सप्टेंबर २००१ च्या शासन निर्णयाद्वारे वाहन धोरण विहित करण्यांत आल्यानंतर स्वत:चे वाहन वापरणा-या अधिका-यास त्यांने वाहन वापरल्या प्रित्यर्थ मिळणा-या भरपाईची रक्कम कशा प्रकारे परिगणीत करावी याबाबत विविध पातळीवर मुद्दे उपस्थित करण्यांत आले आहेत. वाहन धोरण विहित करीत असतांना, शासनामध्ये वाहन देय असलेल्या पदांसाठी वाहन उपलब्ध करुन दिल्यानंतर जो खर्च शासनाला करावा लागत होता तो खर्च शासनास करावा लागू नये हा प्रमुख हेतु होता. त्या अनुषंगाने अधिका-यांना स्वत:चे वाहन वापरण्यास अनुज्ञेयता दिल्यानंतर तो खर्च शासनाऐवजी संबंधित अधिका-यांने करणे अपेक्षित आहे व त्याची भरपाई शासनाने करायची आहे. त्यानुसार कमीत कमी किती रक्कम अनुज्ञेय होईल या बाबतही सुस्पष्टता आणावी या अनुषंगाने आलेल्या विनंतीचा विचार करुन शासन धोरण विहित करीत असतांना मंत्रिमंडळासमोर सादर झालेल्या प्रस्तावातील परिगणनेनुसार शासन निर्णयाच्या परिच्छेद ५(अ)(१) व (२) मधील सुत्रानुसार येणारी रक्कम पुढील प्रमाणे राहील.

**तक्ता क्रमांक -१**

| सूत्र | | | उदाहरण, | |
|---|---|---|---|---|
| १ | वाहनाची किंमत | क्ष | मारुती व्हॅन | २,४५,२८२ |
| २ | कर्ज (वाहनाच्या किंमतीच्या ८५ टक्के) | य | कर्ज | २,०८,४८९ |
| ३ | व्याज (१२ टक्के) वार्षिक | र | व्याज | २९,४३३ |
| ४ | घसारा (१० टक्के) वार्षिक | ल | घसारा | २५,०१८ |
| ५ | वाहन चालकाचा पगार (रु.३५०० स्थिर) दरमहा | व | वाहन चालकाचा पगार | ४२,००० |
| ६ | देखभाल दुरुस्ती वार्षिक (२ टक्के) | ष | देखभाल दुरुस्ती | ४,९०६ |
| ७ | एक वेळचा कर (भागीले १०) | स | एक वेळचा कर (अंदाजे) | १,००० |
| ८ | विमा | ह | विमा (अंदाजे) | ३०० |
| | | | एकूण .... | १,०२,६५७ |
| | | | मासिक | ८,५५५ |
| सूत्र= (र+ल+व+ष+स+ह) भागीले १२ | | | | |

प्रति कि.मी. दरासंबंधी निर्देशांक सूत्र:

तक्ता क्रमांक - २

| | | |
|---|---|---|
| १ | एकूण कि.मी. "अ" | १५०० कि.मी. (अंदाजे) |
| २ | कि.मी. प्रति लिटर - "ब" | १२ कि.मी. (सरासरी) |
| ३ | खर्च प्रति लिटर - "क" | रु.३१ (पेट्रोल)<br>रु.२० (डिझेल) |
| | सूत्र - "अ" भागिले "ब" x "क" | रु.३८७५ (पेट्रोल)<br>रु.२५०० (डिझेल) |

**तक्ता क्रमांक १ + २ = अनुज्ञेय प्रतिपूर्ती**

२. वरील सूत्राप्रमाणे येणारी पेट्रोल व डिझेल वाहनासाठी दरमहा अनुक्रमे रुपये १२,४३० व रुपये ११,०५१ /- एवढी रक्कम वाहनधारकाला देय होईल. शासन निर्णय दिनांक १० सप्टेंबर २००१ च्या जोडपत्र "ब" मधील विवरणामध्ये दर्शविलेल्या सर्वात कमी किंमतीच्या वाहनांची किंमत धरुन सदर रक्कम परिगणीत करण्यांत आली आहे. तथापि, जोडपत्र "ब" मधील विवरणामध्ये विहित केलेल्या वाहनाच्या प्रवर्गातील निम्नतम किंमतीचे वाहन विचारात घेवून वरील सूत्राद्वारे येणारी रक्कम ही अंतिम देय रक्कम राहील.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने

गौ.जो.रसाळ

शासनाचे उप सचिव

प्रति,

♦१. प्रधान महालेखापाल (लेखा परीक्षा)-१, महाराष्ट्र, मुंबई ४०० ०२०

♦२. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)-१, महाराष्ट्र, मुंबई ४०० ०२०

♦३. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)-२, महाराष्ट्र, नागपूर

♦४. महालेखापाल (लेखा परीक्षा)-२, महाराष्ट्र, नागपूर

५. राज्यपालांचे सचिव

६. मुख्यमंत्र्यांचे प्रधान सचिव

७. उप मुख्य मंत्र्यांचे प्रधान सचिव

८. सर्व मंत्री व राज्यमंत्री यांचे स्वीय सहाय्यक

९. मंत्रालयातील सर्व प्रशासनिक विभागांचे अतिरिक्त मुख्य सचिव /प्रधान सचिव/सचिव

१०. अधिदान व लेखा अधिकारी, वांद्रे(पूर्व), मुंबई ४०० ०५१

११. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई

१२. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई

१३. संचालक, लेखा व कोषागारे, मुंबई

१४. मुख्य लेखा परीक्षक, स्थानिक निधी लेखा, कोकणभवन,नवी मुंबई

♦१५. प्रबंधक, उच्च न्यायालय (मूळ शाखा), मुंबई

♦१६. प्रबंधक, उच्च न्यायालय, (अपील शाखा), मुंबई

♦१७. प्रबंधक, महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरण, कुटीर क्र.३ व ४, अधिदान व लेखा कार्यालय आवार, मुंबई

♦१८. प्रधान सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई

♦१९. सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई

♦२०. प्रबंधक, लोक आयुक्त व उप लोक आयुक्त यांचे कार्यालय, मादाम कामा रोड, मुंबई

♦ २१. प्रमुख न्यायाधीश, कुटुंब न्यायालय, नागपूर/मुंबई, वांद्रे, मुंबई ५१

२२. उप संचालक, लेखा व कोषागारे, कोकण विभाग कोकण भवन, नवी मुंबई/ पुणे/ नागपूर / औरंगाबाद / नाशिक / अमरावती

२३. उप मुख्य लेखा परीक्षक (वरिष्ठ), स्थानिक निधी लेखा, कोकण विभाग,कोकण भवन, नवी मुंबई / पुणे /नागपूर/ औरंगाबाद/नाशिक/अमरावती

२४. सर्व जिल्हा कोषागार अधिकारी

२५. सर्व उप कोषागार अधिकारी

२६. मंत्रालयाच्या सर्व प्रशासनिक विभागांच्या नियंत्रणाखालील सर्व विभाग प्रमुख, प्रादेशिक कार्यालय प्रमुख आणि कार्यालय प्रमुख

२७. सहकार व वस्त्रोद्योग विभाग( कार्यासन -हाऊसिंग सेल ,१९ -सी ) मंत्रालय, मुंबई:३२

२८. सर्व विभागीय आयुक्त

२९. परिवहन आयुक्त, महाराष्ट्र राज्य, मुंबई

३०. सर्व जिल्हाधिकारी

३१. सर्व जिल्हा परिषदांचे मुख्य कार्यकारी अधिकारी

३२. सर्व जिल्हा परिषदांचे अर्थ विभागातील मुख्य लेखा व वित्त अधिकारी

३३. विशेष आयुक्त, महाराष्ट्र सदन, कोपर्निकस रोड, नवी दिल्ली ११० ००१

३४. संचालक (माहिती), महाराष्ट्र परिचय केंद्र, अ-८, स्टेट एम्पोरिया इमारत, बाबा खरकसिंग मार्ग, नवी दिल्ली ०१

३५. वित्त विभागातील सर्व कार्यासने

३६. निवड नस्ती, विनियम, वित्त विभाग

♦ पत्राद्वारे.